WAVES-2025 च्या आयोजन व नियोजनासाठी सांस्कृतिक कार्य विभागाची सुकाणू समिती गठित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१४/सां.का.१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २० मार्च, २०२५

**वाचा :** महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, मुंबई यांचे पत्र -
क्र.संकीर्ण-२०२४/व्हीशांजीपु/राजीपु/ज.वि.३४/७२, दि.१३ मार्च, २०२५

**प्रस्तावना :**

केंद्र सरकारच्या माहिती व प्रसारण मंत्रालयाच्या वतीने WAVES Summit 2025 (World Audio, Visual and Entertainment Summit) चे आयोजन जिओ वर्ल्ड सेंटर, मुंबई येथे दिनांक ०१ ते ०४ मे, २०२५ रोजी करण्यात येणार आहे. सदर कार्यक्रमास मा. पंतप्रधान, श्री. नरेंद्र मोदी तसेच देश-विदेशातील मान्यवर उपस्थित राहणार आहेत. सदर कार्यक्रमाच्या अनुषंगाने, विभागामार्फत करावयाच्या आयोजन-नियोजन तसेच इतर अनुषंगिक बाबींसाठी समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

जिओ वर्ल्ड सेंटर, मुंबई येथे दिनांक ०१ ते ०४ मे, २०२५ या कालावधीत आयोजित करण्यात येणाऱ्या WAVES Summit 2025 (World Audio, Visual and Entertainment Summit) या कार्यक्रमासाठी आयोजन- नियोजनासाठी खालील प्रमाणे समिती गठित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

| अ. क्र | समिती सदस्याचे नाव | पदनाम | पद |
|---|---|---|---|
| १. | श्रीमती स्वाती म्हसे-पाटील | व्यवस्थापकीय संचालक, दादासाहेब फाळके चित्रनगरी | अध्यक्ष |
| २. | श्री. महेश वाव्हळ | उप सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| ३. | श्री. बिभीषण चवरे | संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय | सदस्य |
| ४. | श्री. तेजस गर्गे | संचालक, पुरातत्व व वस्तूसंग्रहालय | सदस्य |
| ५. | श्रीमती मीनल जोगळेकर | संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी | सदस्य |
| ६. | श्री. सचिन निंबाळकर | सहसंचालक तथा सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य हिंदी, सिंधी, गुजराती अकादमी | सदस्य |
| ७. | श्री. संतोष खामकर | व्यवस्थापक (कलागारे) दादासाहेब फाळके चित्रनगरी | सदस्य |
| ८. | श्री. संजय पाटील | विशेष कार्यकारी अधिकारी, दादासाहेब फाळके चित्रनगरी | सदस्य |
| ९. | श्रीमती सुचित्रा देशपांडे | विशेष समन्वय अधिकारी, दादासाहेब फाळके चित्रनगरी | सदस्य |
| १०. | श्री. सुजीतकुमार उगले | संचालक, पुराभिलेख संचालनालय तथा सह व्यवस्थापकीय संचालक, दादासाहेब फाळके चित्रनगरी | सदस्य सचिव |

०२. अ) समितीची कार्यकक्षा :- सांस्कृतिक कार्यक्रमाच्या आयोजन-नियोजनाची जबाबदारी तसेच इतर प्रशासकीय व अनुषंगिक बाबी.

ब) समितीचा कार्यकाल :- सदर समितीचा कार्यकाल १ वर्ष अथवा शासनाचे पुढील आदेश निर्गमित होईपर्यंत.

०३. सदर समिती शासनास वेळोवेळी अहवाल सादर करेल.

०४. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३२०१११३२३२७२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA
SURYAKANT
DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2025.03.20 11:54:52 +05'30'

**( अनिरुध्द सू. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. सचिव, माहिती व प्रसारण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली
३. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (उद्योग) तथा मुख्य समन्वयक, WAVES Summit 2025, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ, गोरेगाव, मुंबई- यांना विनंती करण्यात येते की, सर्व समिती सदस्य तसेच केंद्र शासनाकडे सदरचा शासन निर्णय पाठविण्याची व्यवस्था करावी.
६. उप सचिव (सां.का.१), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती - सां.का.१